**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः कअप १२१६/प्र.क्र. ८०/१४ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १० जुलै, २०१७

**आदेश :-**

मंत्रालयीन विभागातील श्री. सु.स. राठोड (विजा-अ), सहायक कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग यांना कक्ष अधिकारी पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून, त्यांची पदस्थापना पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामध्ये रिक्त असलेल्या कक्ष अधिकारी पदावर करण्यात येत आहे.

२. श्री. सु.स.राठोड, यांना कक्ष अधिकारी पदावरील तदर्थ पदोन्नती त्यांचेविरूध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित नाही, या धारणेच्या अधीन तसेच खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

(अ) श्री. राठोड, यांची तदर्थ पदोन्नती मा. उच्च न्यायालयात दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५, २९८२/२०००, २९८६/२०००, ४९५८/२००३, ३३७४/२०११ वरील अंतिम निकालाच्या अधीन राहतील. तसेच मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई येथे दाखल केलेला मूळ अर्ज क्रमांक ८६२/२०१६ च्या न्यायनिर्णयाच्या अधीन राहील.

(ब) सदर तदर्थ पदोन्नती अकरा महिने किंवा सामान्य प्रशासन विभागाकडून निवडसूचीवरील नियमित कक्ष अधिकारी नियुक्त होईपर्यंत यापैकी जे लवकर होईल तेवढ्या कालावधीकरिता असेल.

(क) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ कक्ष अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी कक्ष अधिकारी संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्याला पदावनत करण्याच्या अधीन सदर तदर्थ पदोन्नत्ती देण्यात येत आहेत.

(ड) श्री. राठोड, सहायक कक्ष अधिकारी यांची कक्ष अधिकारी पदावरील तदर्थ पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

(इ) या तदर्थ पदोन्नतीमुळे श्री. राठोड, सहायक कक्ष अधिकारी यांना नियमित पदोन्नतीचे, ज्येष्ठतेचे किंवा आणखी कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

३. श्री. राठोड, सहायक कक्ष अधिकारी यांनी कक्ष अधिकारी पदाची पदोन्नती न स्विकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दिनांक १२.०९.२०१६ अन्वये त्यांचे नाव सन २०१६-२०१७ च्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल व पुढील दोन वर्षी होणाऱ्या निवडसूच्यांमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत कक्ष अधिकारी पदावरील पदोन्नतीसाठीची पात्रता तपासण्यात येईल.

४. हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

५. महाराष्ट्र राज्याचे प्रशिक्षण धोरणातील तरतुदीनूसार पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण घेणे बंधनकारक राहील, अन्यथा श्री. राठोड, यांना सहायक कक्ष अधिकारी पदावर पदावनत करण्यात येईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७१०१३०२१७९९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration, postalCode=400032, st=Andhra Pradesh, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2017.07.10 13:00:45 +05'30'

**(ग. भि. गुरव)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

श्री. सु.स.राठोड, सहायक कक्ष अधिकारी, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई. (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

**प्रत,**

१ अ.मु.स./प्रधान सचिव, जलसंपदा विभाग/ पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

२ सह सचिव/उप सचिव (आस्थापना), जलसंपदा विभाग/ पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

३ कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, का.क्र./१४,१४-अ

४ निवडनस्ती, का.क्र.१४-ब /संग्रहार्थ